**कनिष्ठ अभियंता (विद्युत) (गट-ब) अराजपत्रित या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंतीनुसार बदल्या.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्रमांक: मुविनि-२०१८/प्र.क्र. १३३ (भाग-२)/ऊर्जा-५**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०४ जानेवारी, २०१९

वाचा:- (१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५
(२) शासन आदेश क्रमांक: मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा-५ दि. ०८ जुलै, २०१८.
(३) मुख्य विद्युत निरीक्षक कार्यालयाचे पत्र क्रं. मुविनि/का.२/मुलि/गोप/८९/२०१८ दि. ०१ ऑगस्ट, २०१८

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार विद्युत निरीक्षणालय शाखेतील अधिकारी/ कर्मचारी यांच्या बदल्यांचे अधिकार अधिसूचित केल्यानुसार, सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, श्रीम. भाग्यश्री सुधाकर चव्हाण, कनिष्ठ अभियंता (विद्युत), गट (ब) अराजपत्रित यांची उपरोक्त संदर्भ क्रं.२ च्या शासन आदेशान्वये अधिक्षक अभियंता, औरंगाबाद यांचे कार्यालयात सरळसेवेने नियुक्ती करण्यात आली होती. परंतु त्यांची संदर्भ क्रं ३ येथील विनंती विचारात घेऊन, त्यांना विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, अमरावती या ठिकाणी या आदेशान्वये बदली करण्यात येत आहे.

२. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्याला त्यांच्या नविन नियुक्तीचे ठिकाणी त्वरीत कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणुकीच्या जागी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे. बदली झालेल्या अधिकाऱ्यास रजा मंजूर करु नये.

३. तसेच या आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्या रद्द करणे किंवा त्यात बदल करणे यासाठी राजकीय दडपण/दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित कनिष्ठ अभियंता (विद्युत) (गट-ब) महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरु करण्यात येईल.

हे शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११०१५२२२१९९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

BHIMASHANKAR YALLAPPA MANTA

Digitally signed by BHIMASHANKAR YALLAPPA MANTA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, postalCode=400032, street=GOVERNMENT OF MAHARASHTRA,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=aa263c6e4b287b249819a6233cf718b1f9c2edc473ecaa592812fbda1f060335, ou=ENERGY DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BHIMASHANKAR YALLAPPA MANTA
Date: 2019.01.10 15:31:23 +05'30'

**( भि. य. मंता )**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू.) मुंबई-७१.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र नागपूर.

३) अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/ निवासी लेखाधिकारी, मुंबई.

४) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/अमरावती

५) उपसचिव (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

६) श्रीम. भाग्यश्री सुधाकर चव्हाण, कनिष्ठ अभियंता (विद्युत) (गट-ब), अधिक्षक अभियंता, औरंगाबाद कार्यालय

७) निवड नस्ती ऊर्जा-५.

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

५) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.